**राज्य योजना "हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६ २२४१)" योजनेंतर्गत विविध कार्यबाबींचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०८.२३/प्र.क्र.२६०/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी १०१२/प्र.क्र. १२२/फ-१ दि. ०३.११.२०१२
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी ०६१४/प्र.क्र.१६७/फ-१ दि. १२.१०.२०१५
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी ०४१७/प्र.क्र.१०७/फ-१ दि. १०.०१.२०१८
४.महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी ०११९/ प्र.क्र.१६/फ-१ दि. ०६.०३.२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात वन्यजीव संरक्षणाच्या दृष्टीने वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ च्या तरतूदीनुसार राष्ट्रीय उद्याने, अभयारण्ये व संवर्धन राखीव क्षेत्र अधिसूचित करण्यात आली आहेत. तसेच राज्यामध्ये ६ व्याघ्र प्रकल्पांची देखील निर्मिती करण्यात आली आहे. तथापि, सदर कायद्यातील तरतुदी तसेच सर्वोच्च न्यायालयाचे निर्णय विचारात घेता संरक्षित क्षेत्रामध्ये असलेल्या गावांना अन्य क्षेत्रात असलेल्या गावांप्रमाणे पायाभूत सुविधा पुरविताना मर्यादा येतात. त्याचप्रमाणे वन्य प्राण्यांसाठी सुरक्षित अधिवास निर्माण करण्याकरिता व मानव-वन्यजीव संघर्ष कमी करण्याच्या दृष्टीने संरक्षित क्षेत्रातील मानवी वस्तींना अभयारण्य/राष्ट्रीय उद्यानाबाहेर पुनर्वसीत करणे आवश्यक आहे. त्यामुळे संरक्षित क्षेत्रातील गावकऱ्यांचा विकास व वन्यजीव संवर्धनाचा सुवर्णमध्य गाठण्यासाठी संरक्षित क्षेत्रातील गावांचे पुर्नवसन आवश्यक ठरते.

या अनुषंगाने शासनाने संदर्भ क्रं. १ च्या शासन निर्णयानुसार धोरण निश्चित केले आहे व संदर्भ क्र. २, ३ व ४ नुसार त्यामध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे. उपरोक्त धोरणाच्या अंमलबजावणीकरिता विभागाकडील हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६ २२४१) या राज्य योजनेच्या कार्यबाबी स्पष्टपणे विनिर्दिष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्य योजना "हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६ २२४१)" या योजनेतंर्गत खालील कार्यबाबींचा समावेश करण्यात येत आहे :-

**योजनेचे मुख्य उद्दिष्ट :-**

वन्य प्राण्यांसाठी सुरक्षित अधिवास निर्माण करण्याकरिता व मानव-वन्यजीव संघर्ष कमी करण्याच्या दृष्टीने संरक्षित क्षेत्रातील मानवी वस्तींना अभयारण्य/राष्ट्रीय उद्यानाबाहेर पुनर्वसीत करुन संरक्षित क्षेत्रातील गावकऱ्यांचा विकास व वन्यजीव संवर्धनाचा सुवर्णमध्य गाठणे.

**योजनेंतर्गत समावेश करावयाच्या कार्यबाबी :-**

१. पुनर्वसन पॅकेजची रक्कम अदा करणे / मालमत्तेचे मूल्यांकन अदा करणे.

i. पर्याय १ नुसार पुनर्वसन पॅकेजची रक्कम अदा करणे
ii. शेतजमीन, घर, फळझाडे इत्यादी मालमत्तेचे व अनुषंगिक बाबींचे मूल्यांकन व दिलासा रक्कम अदा करणे
iii. संरक्षित क्षेत्र अधिसूचित केल्यानंतर स्थानिकांचे हक्क निर्धारित करून मोबदला अदा करणे

२. पर्याय २ नुसार पुनर्वसित गावांना महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त लोकांचा पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील कलम १० नुसार द्यावयाच्या १८ सार्वजनिक सुविधा पुरविणे तसेच पुनर्वसनाशी संबंधित इतर पूरक व अनुषंगिक कामे करणे.

३. पर्याय २ नुसार पुनर्वसित गावांकरीता नजीकच्या पाटबंधारे प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात जमीन उपलब्ध नसल्यास किंवा शासकीय जमीन / ई-क्लास जमीन उपलब्ध नसल्यास खालील पर्यायानुसार कार्यवाही करणे :-

i. पर्यायी जमीनीच्या वाटपासाठी खाजगी जमीन आवश्यक कार्यपद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यासाठी अनुदान देणे
ii. जमीन उपलब्ध झाली नसल्यास संबंधित प्रकल्पग्रस्तांना त्यांना देय असलेल्या जमिनीची महानोंदणी निरिक्षक यांचेकडील लागू असलेल्या तारखेपासून शीघ्र सिद्धगणक दर पद्धतीप्रमाणे किंमत व त्यावर अतिरिक्त दिलासा रक्कम ३०% सानुग्रह अनुदान अदा करणे

४. पुनर्वसित होणाऱ्या कुटुंबास पुनर्वसन पॅकेजनुसार घराकरिता अनुदान देणे, अनुज्ञेय भत्ता अदा करणे व इतर अनुषंगिक रक्कम अदा करणे.

५. योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता लागणारे मनुष्यबळ, साहित्य व क्षेत्रीय यंत्रणा सबळ करण्याकरिता अनुदान देणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१३५३५८३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.03.13 14:02:56 +05'30'

**(सिद्धेश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई / पूर्व नागपूर.
५) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प
६) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उप वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)
७) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) कार्यासन अर्थ-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

९) कार्यासन - १४७४, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई - ३२.
१०) कार्यासन- ब- १, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).